**महा ई-सेवा केंद्रामार्फत राज्यातील जनतेस विविध प्रमाणपत्रे सुलभतेने देण्यासाठी आवश्यक असलेल्या दस्तावेजांचे standardisation करणे व कार्यपध्दतीत सुलभता आणण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
माहिती तंत्रज्ञान संचालनालय,
परिपत्रक क्रमांक: मातंसं/नस्ती०९/प्रक्र ४२/३९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २६ ऑगस्ट, २००९

परिपत्रक:

सध्या विविध प्रमाणपत्रांसाठी सेतु केंद्रे तालुका / जिल्हा पातळीवरील विविध शासकीय कार्यालये या ठिकाणी आवश्यक असलेल्या दस्तावेजांमध्ये एकसुत्रता नाही. काही जिल्हाधिकारी कार्यालयांनी पुढाकार घेऊन यामध्ये सुधारणा करुन नागरिकांना तत्परतेने व सुलभतेने प्रमाणपत्रे पुरविण्यांचे दृष्टीने पाऊले उचलली आहेत.

२. ई-गव्हर्नन्सबाबत राज्य शासनाने घेतलेला पुढाकार तसेच प्रशासनामध्ये अधिक गतिमानता तसेच अधिक पारदर्शीपणा आणण्याचे उद्देशाने राज्य शासनामार्फत दिल्या जाणाऱ्या सर्व प्रकारच्या प्रमाणपत्रांसाठी आवश्यक असणाऱ्या दस्तावेजांचे standardisation करण्याचे प्रस्तावित आहे. हे प्रमाणीकरण करण्यांसाठी काही महत्वाच्या शासकीय कार्यपध्दतींमध्ये आमुलाग्र बदल करणे देखील अनिवार्य राहील.

३. उपरोल्लेखित बाबींचा सखोल अभ्यास करुन महा ई-सेवा केंद्रामार्फत एका छत्राखाली राज्यातील जनतेस सुलभतेने प्रमाणपत्रे देण्यासाठी दस्तावेजांमध्ये तसेच कार्यपध्दतीत आवश्यक ते बदल सुचविणे व अंतिम निर्णय घेणे याबाबत पुढील प्रमाणे समिती प्रस्तावित करण्यात येत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| १ | श्री. अ. भू. पांडे | सचिव (मातं) | अध्यक्ष |
| २ | श्री. संजय कुमार | सचिव शिक्षण विभाग(माजी आयुक्त,औरंगाबाद | सदस्य |
| ३ | श्री. शैलेश कुमार शर्मा | जमाबंदी आयुक्त, ठाणे | सदस्य |
| ४ | श्री.संजय चहांदे | सचिव, महिला बालकल्याण, मुंबई | सदस्य |
| ५ | श्री.संजीव कुमार | विभागीय आयुक्त,नागपुर विभाग | सदस्य |
| ६ | श्री.प्रभाकर देशमुख | कृषि आयुक्त (माजी जिल्हाधिकारी,माजी विभागीय आयुक्त) | सदस्य |
| ७ | श्री. एस चोक्कलिंगम | अपर विक्रीकर आयुक्त, (माजी जिल्हाधिकारी,नाशिक) | सदस्य |
| ८ | श्री. आर.एस.मोपलवार | सह मुख्य कार्य अधिकारी,एमआयडीसी (माजी जिल्हाधिकारी, नांदेड | सदस्य |
| ९ | विधी व न्याय विभागाचे प्रतिनिधी | | सदस्य |
| १० | श्री.श्रीकर परदेशी | जिल्हाधिकारी, नांदेड | सदस्य |
| ११ | श्री.एस.ओ.सोनावणे | जिल्हाधिकारी, रायगड | सदस्य |
| १२ | श्री. मोईज हुसेन | राज्य सुचना विज्ञान अधिकारी,मुंबई | सदस्य |
| १३ | श्री. प्र. दि. सोहळे | संचालक (मातं) | सदस्य सचिव |

४. वरील समिती ही दोन महिन्यांच्या कालावधीत जास्तीत जास्त तीन बैठकांमध्ये दस्तावेजांचे प्रमाणिकरण तसेच कार्यपध्दतींमध्ये आवश्यक त्या सुधारणा सुचवुन शासनास अहवाल सादर करतील.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८२६१७१७३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( डॉ. संतोष भोगले )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत सादर,**

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,

**प्रत माहिती व आवश्यकत्या कार्यवाहीसाठी रवाना**

सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा सूचना विज्ञान अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मे. PWC (प्रकल्प सल्लागार)
राज्य सूचना विज्ञान अधिकारी, मुंबई
निवड नस्ती (२ प्रती).